**कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे अंतर्गतची बांधकाम कार्यप्रकारातील विभाग व उपविभाग कार्यालयांची मंडळ कार्यालयनिहाय फेररचना करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आढावा-२०१६/ प्र.क्र. २९८/ २०१६/ आ.(प्रशि.),**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
तारीख: ७ मार्च, २०१७.

वाचा -

१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. ईआरडब्ल्यू-१०८३/सीआर-६११/८३/एडीएम-९, दि. ८/३/१९८४.
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.१०९२/सीआर/८०६/व्यय-६, दिनांक १५/१०/१९९२.
३) शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्र. आढावा-१००२/३३५/२००२/आ.(प्रशि.), दि.६/२/२००३.
४) शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्र.आढावा-२०१६/प्रक्र.२०/२०१६/ आ.(प्रशि.), दि.२७.०१.२०१६.
५) शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्र.आढावा-२०१५/प्रक्र.२०२/२०१५/ आ.(प्रशि.), दि.२२.०७.२०१६.

**प्रस्तावना -**

कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे अंतर्गतच्या मंडळ कार्यालयांकडील बांधकाम कार्यप्रकारातील विभाग/ उपविभाग सिंचन व्यवस्थापन कार्यप्रकारात रुपांतरीत करुन, सिंचन व्यवस्थापन कार्यालयांची फेररचना अ.क्र.५ अन्वये करण्यात आली आहे. अशाच प्रकारे महामंडळांतर्गतच्या मंडळ कार्यालयांकडील बांधकाम, सर्वेक्षण-अन्वेषण, विद्युत कार्यप्रकारातील विभाग/ उपविभाग कार्यालयांची प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने तसेच चितळे समितीच्या सिंचन विषयक ४२ सुधारणांनुसार ठाणे पाटबंधारे मंडळ, ठाणे, उत्तर कोकण पाटबंधारे प्रकल्प मंडळ, कळवा-ठाणे, रत्नागिरी पाटबंधारे मंडळ, रत्नागिरी व दक्षिण कोकण पाटबंधारे प्रकल्प मंडळ, सिंधुदुर्ग या मंडळ कार्यालयांतर्गतच्या विभाग व उपविभाग कार्यालयांच्या नावात, कार्यप्रकारात, मुख्यालयात व मंडळीय/ विभागीय नियंत्रणात बदल करुन, मंडळ कार्यालयांची फेररचना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. यानुषंगाने पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय -**

कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे अंतर्गतच्या ठाणे पाटबंधारे मंडळ, ठाणे, उत्तर कोकण पाटबंधारे प्रकल्प मंडळ, कळवा-ठाणे, रत्नागिरी पाटबंधारे मंडळ, रत्नागिरी व दक्षिण कोकण पाटबंधारे प्रकल्प मंडळ, ओरोस-सिंधुदुर्ग या मंडळ कार्यालयांतर्गतचे बांधकाम, सर्वेक्षण-अन्वेषण व विद्युत कार्यप्रकारातील विभाग व उपविभाग कार्यालयांचे आवश्यकतेनुसार त्यांच्या नावात, कार्यप्रकारात, मुख्यालयात व मंडळीय/ विभागीय नियंत्रणात बदल करुन, मंडळनिहाय विभाग व उपविभाग कार्यालयांच्या फेररचनेस सोबतच्या विवरणपत्रांमध्ये दर्शविल्याप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे.

२. ठाणे पाटबंधारे मंडळ, ठाणे अंतर्गतच्या पालघर पाटबंधारे विभाग, मनोर, जि.पालघर अंतर्गतचे भातसा कालवा उपविभाग क्र.४, वाशिंद, जि.ठाणे हे उपविभागीय कार्यालय तांत्रिक कक्ष (जलआराखडा), कोकण प्रदेश, मुंबई या नावाने मुख्य अभियंता, कोकण प्रदेश, मुंबई यांचे नियंत्रणाखाली कार्यरत राहील. (प्रपत्र-अ) तसेच भातसा संपर्क उपविभाग, ठाणे हे उपविभागीय कार्यालय तांत्रिक कक्ष (जलआराखडा), ठाणे या नावाने ठाणे पाटबंधारे मंडळ, ठाणे या मंडळ कार्यालयाच्या थेट नियंत्रणाखाली कार्यरत राहील. (प्रपत्र -ब )

३. मंडळ, विभाग/ उप विभाग कार्यालयांच्या मूळ नावात व कार्यप्रकारात होणाऱ्या बदलास पुढील अटींच्या अधीन राहून शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

अ) प्रपत्र “अ” ते “ई” मध्ये दर्शविल्यानुसार ज्या कार्यालयांच्या मंडळीय/ विभागीय नियंत्रणात बदल करण्यात आला आहे. त्या विभाग व उपविभाग कार्यालयांची मंजूर आस्थापना व कार्यालयीन अभिलेख संलग्न होणाऱ्या मंडळीय/ विभागीय कार्यालयांतर्गत (रुपांतरीत अस्थायी आस्थापना कार्यरत असल्यास त्यासह) वर्ग करण्यात यावी.

आ) वर्गीकरण झालेली सर्व कार्यालये शासकीय जागेतच ठेवावीत, त्यासाठी बांधकामाचा वेगळ्याने खर्च करु नये. तसेच सध्याच्या कार्यरत विभाग / उपविभागांमधील उपलब्ध साहित्याचाच वापर करण्यात यावा. प्रशासकीय व आस्थापना खर्चात वाढ होणार नाही याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनावर कोणताही आर्थिक भार पडणार नाही.

इ) ज्या विभागीय/ उपविभागीय कार्यालयातील मूळ कार्यभारातून काही कार्यभार कमी करुन, अन्य कार्यालयांतर्गत संलग्न करण्यात आला आहे अशी कार्यालये उर्वरित कार्यभारासह फेररचना केल्यानुसार मंडळ/विभागीय कार्यालयांतर्गत कार्यरत राहतील. तसेच ज्या कार्यालयांकडील कामे पूर्ण झाल्याने / पूर्णत्वास असल्याने ती बंद वा अन्यत्र स्थलांतरीत करण्यात आली आहेत, परंतु त्यांचेकडील कार्यालयीन अभिलेख / उर्वरित कार्यभार- अन्य कार्यालयांतर्गत संलग्न करण्यात आलेला नाही अशा कार्यालयाचा अभिलेख व उर्वरित कार्यभार कार्यरत विभाग/उपविभागांतर्गत संलग्न करण्याबाबत कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांनी आवश्यक ती सर्व कार्यवाही तात्काळ करावी.

४. शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक: ईआरडब्ल्यू -१०८३/ सीआर-६११/८३/ एडीएम-९, दिनांक ८ मार्च, १९८४ मधील तरतूदीनुसार, मंडळ कार्यालयांतर्गतच्या विभागीय कार्यालयांचे “कार्यकारी अभियंता” हे आहरण व संवितरण अधिकारी व “संबंधित मंडळ कार्यालयांचे “अधीक्षक अभियंता” हे संबंधित विभागांचे नियंत्रण अधिकारी म्हणून याव्दारे घोषित करण्यात येत आहे.

५. बांधकाम कार्यप्रकारातील विभाग/ उपविभाग कार्यालयांचा वेतन/ वेतनेतर खर्च “४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, योजनांतर्गत १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांतील गुंतवणुका (०४) योजनांतर्गत वेतनावरील खर्चासाठी भाग भांडवली अंशदान (०४) (०३) कोकण पाटबंधारे विभाग महामंडळ, भाग भांडवली अशंदान (४७०१ अरस-१८९) या लेखाशीर्षाखाली मंजूर अनुदानातून भागवावा.

तसेच ठाणे पाटबंधारे मंडळ, ठाणे अधिनस्तच्या ठाणे पाटबंधारे विभाग, ठाणे अंतर्गतच्या जलसंपत्ती सर्वेक्षण व अन्वेषण उपविभाग, धोंडावडवली, (२) पालघर पाटबंधारे विभाग, मनोर अंतर्गतच्या पाटबंधारे बांधकाम उपविभाग, मनोर या कार्यालयांचे वेतन/वेतनेतर खर्च “२७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे (योजनेतर), ८० सर्वसाधारण, ००१ संचालन व प्रशासन, (४) व्यवस्थापन आस्थापना (एक) आस्थापना मा.क्र. आय-३(२७०१ ४१९९)” या लेखाशीर्षाखाली मंजूर अनुदानातून भागवावा.

६. मुख्य अभियंता, कोकण प्रदेश, मुंबई या प्रादेशिक विभागांतर्गत ठाणे पाटबंधारे मंडळ, ठाणे, उत्तर कोकण पाटबंधारे प्रकल्प मंडळ, कळवा-ठाणे, रत्नागिरी पाटबंधारे मंडळ, रत्नागिरी व दक्षिण कोकण पाटबंधारे प्रकल्प मंडळ, ओरोस-सिंधुदुर्ग या मंडळांतर्गतच्या बांधकाम कार्यप्रकारातील विभाग, उपविभाग कार्यालयांच्या फेररचनेनुसार (नाव, मुख्यालय इ.बदलांसह) दिनांक ०२.०५.२०१७ पासून कार्यान्वित होतील. याद्दष्टीने कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांनी आवश्यक ती सर्व कार्यवाही करावी.

७. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.१०९२/ सीआर-८०६/ व्यय-६, दिनांक १५-१०-१९९२ मधील तरतूदींनुसार विभागास प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार व आंतर वित्त सल्लागार व उप सचिव यांचे सहमतीने हा आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०७१६३७१८६५२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sangeeta M Kholgadge

Digitally signed by Sangeeta M Kholgadge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SECTION OFFICER, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=24b378b1cb0f3c9d70d93261e45c83a11f0c2bbeb199c1858522d36476761396, cn=Sangeeta M Kholgadge
Date: 2017.03.08 12:16:42 +05'30'

**( सं.म.खोलगाडगे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव.
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३) मा.मंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव.
४) मा.मंत्री (खारभूमी) यांचे खाजगी सचिव.
५) मा.राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक.
६) मा.विधानसभा/ विधान परिषद सदस्य (सर्व)
७) प्रधान सचिव (जलसंपदा प्रकल्प व विकास), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) सचिव (जलसंपदा व्यवस्थापन व लाभक्षेत्र विकास), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
११) महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा) मुंबई/नागपूर.
१२) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१३) सर्व महासंचालक/कार्यकारी संचालक (महामंडळ)
१४) कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे.
१५) सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) मुख्य अभियंता, कोकण प्रदेश, मुंबई.
१७) सर्व मुख्य अभियंता व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
१८) आंतर वित्तीय सल्लागार व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई .
१९) अधीक्षक अभियंता, ठाणे पाटबंधारे मंडळ, ठाणे.
२०) अधीक्षक अभियंता, उत्तर कोकण पाटबंधारे प्रकल्प मंडळ, कळवा-ठाणे.
२१) अधीक्षक अभियंता, रत्नागिरी पाटबंधारे मंडळ, रत्नागिरी.
२२) अधीक्षक अभियंता, दक्षिण कोकण पाटबंधारे प्रकल्प मंडळ, सिंधुदुर्ग.
२३) अधीक्षक अभियंता, ई-प्रशासन मंडळ, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
२४) सर्व कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२५) कार्यकारी अभियंता, प्रशासन संगणकीकरण विभाग, पुणे.
(यांना विभाग, उपविभाग कार्यालयांचे फेररचनेनुसार त्यांचे नावात, मुख्यालयात, कार्यप्रकारात, मंडळ /विभाग यांचे नियंत्रणात झालेल्या बदलाप्रमाणे आवश्यकती नोंद घेण्यास्तव अग्रेषित.)
२६) आस्थापना (प्रशिक्षण) संग्रहार्थ.

***********

(शासन निर्णय क्रमांक : आढावा-२०१६/प्र.क्र.२९८/२०१६/ आ. (प्रशि.), दिनांक ०७.०३.२०१७ सोबतचे प्रपत्र-अ)

| कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे व अंतर्गत कार्यालयांची रचना | | | |
|---|---|---|---|
| अ.क्र. | सध्याची कार्यालयाची रचना | बदलानंतरची कार्यालयाची रचना | मंडळ व मंडळांतर्गत कार्यालयांमध्ये झालेले बदल |
| १ | २ | ३ | ४ |
| A | कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे | कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे | ----- |
| A-1 | लघु पाटबंधारे कक्ष, ठाणे | लघु पाटबंधारे कक्ष, ठाणे | ----- |

(प्रपत्र-ब)

| मुख्य अभियंता, कोकण प्रदेश, मुंबई व अंतर्गत कार्यालयांची रचना | | | |
|---|---|---|---|
| अ.क्र. | सध्याची कार्यालयाची रचना | बदलानंतरची कार्यालयाची रचना | मंडळ व मंडळांतर्गत कार्यालयांमध्ये झालेले बदल |
| १ | २ | ३ | ४ |
| A | मुख्य अभियंता, कोकण प्रदेश, मुंबई | मुख्य अभियंता, कोकण प्रदेश, मुंबई | ----- |
| A-1 | ----- | तांत्रिक कक्ष(जल आराखडा), कोकण प्रदेश, मुंबई | ठाणे पाटबंधारे मंडळ, ठाणे अंतर्गतच्या पालघर पाटबंधारे विभाग, मनोर, जि.पालघर अंतर्गतचे भातसा कालवा उप विभाग क्र.४, वासिंद, जि. ठाणे हे उपविभागीय कार्यालय प्रदेश कार्यालयास संलग्न. तसेच उपविभागाच्या नाव,मुख्यालय व नियंत्रणात बदल. |

Sangeeta M Kholgadge

Digitally signed by Sangeeta M Kholgadge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SECTION OFFICER, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=24b378b1cb0f3c9d70d93261e45c83a11f0c2bbeb199c1858522d36476761396, cn=Sangeeta M Kholgadge
Date: 2017.03.08 12:18:33 +05'30'

(सं.म.खोलगाडगे)

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

| (शासन निर्णय क्रमांक : आढावा-२०१६/प्र.क्र.२९८/२०१६/ आ. (प्रशि.), दिनांक ०७.०३.२०१७ सोबतचे प्रपत्र-क) | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **ठाणे पाटबंधारे मंडळ, ठाणे (सिंचन)** | | | | | |
| सध्याची कार्यालयाची रचना | | | बदलानंतरची कार्यालयीन रचना | | मंडळ व मंडळांतर्गत कार्यालयांमध्ये झालेले बदल - |
| अ. क्र. | विभाग कार्यालय | उप विभाग कार्यालय | विभाग कार्यालय | उप विभाग कार्यालय | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| | | | | तांत्रिक कक्ष (जलआराखडा), ठाणे | मंडळाधिनस्तच्या पालघर पाटबंधारे विभाग, मनोर अंतर्गतचे भातसा संपर्क उपविभाग, ठाणे हे उपविभागीय कार्यालय थेट मंडळ कार्यालयाच्या नियंत्रणाखाली तांत्रिक कक्ष (जलआराखडा), ठाणे या नावाने कार्यान्वित करण्यास्तव संलग्न. |
| A | ठाणे पाटबंधारे विभाग, कळवा-ठाणे (सिंचन) | ----- | ठाणे पाटबंधारे विभाग, कळवा-ठाणे (सिंचन) | ----- | ----- |
| A-1 | | ---- | | जलसंपत्ती सर्वेक्षण व अन्वेषण उपविभाग, धोंडावडवली (सर्वेक्षण व अन्वेषण) | चितळे समितीच्या ४२ सुधारणानुसार या मंडळाच्या नियंत्रणाखाली कार्यरत असलेल्या व या फेररचनेन्वये उत्तर कोकण पाटबंधारे प्रकल्प मंडळ, कळवा-ठाणे अंतर्गत वर्ग केलेल्या जलविद्युत प्रकल्प अन्वेषण विभाग क्र.१, भातसानगर या विभागांतर्गतचा **जलविघुत प्रकल्प अन्वेषण उपविभाग क्र.१ (अ), भातसानगर अस्तित्वातील कामासह या विभागांतर्गत जलसंपत्ती सर्वेक्षण व अन्वेषण उपविभाग, धोंडावडवली या नावाने संलग्न करणे.** तसेच उपविभागाच्या नावात, मुख्यालयात व विभागीय नियंत्रणात बदल. |
| | | ---- | | घाटघर उदंचन जलविद्युत प्रकल्प उपविभाग क्र.३, भंडारदरा (विद्युत) | या मंडळ कार्यालयांतर्गतच्या भातसा धरण व्यवस्थापन विभाग, भातसानगर अंतर्गतचे कार्यरत उपविभागीय कार्यालय अस्तित्वातील कामे/ मंजूर आस्थापनेसह या विभागांतर्गत संलग्न. तसेच उपविभागांच्या विभागीय नियंत्रणात बदल. |
| | | ---- | | घाटघर उदंचन जलविद्युत प्रकल्प गुण नियंत्रण उपविभाग क्र.४, चोंढे (विद्युत) | |
| B | रायगड पाटबंधारे विभाग, कोलाड (सिंचन ) | ----- | रायगड पाटबंधारे विभाग, कोलाड (सिंचन ) | ----- | ----- |
| | | लघु पाटबंधारे उपविभाग, कोलाड (बांधकाम) | | वर्ग. | उप विभागीय कार्यालय अस्तित्वातील कामांसह व आस्थापनेसह **उत्तर कोकण पाट.प्रकल्प मंडळांतर्गत रायगड पाटबंधारे विभाग क्र.२,कोकण भवन नवी, मुंबई अंतर्गत वर्ग.** |
| B-1 | | लघु पाटबंधारे उपविभाग, माणगांव (बांधकाम) | | लघु पाटबंधारे उपविभाग, माणगांव (बांधकाम) | उपविभागांतर्गत कोणताही बदल नाही. |
| B-2 | | लघु पाटबंधारे सर्व्हेक्षण उपविभाग, कोलाड (बांधकाम) | | पाटबंधारे बांधकाम उपविभाग, कोलाड (बांधकाम) | उपविभागाच्या नावात बदल. |

| सध्याची कार्यालयाची रचना | | | बदलानंतरची कार्यालयीन रचना | | मंडळ व मंडळांतर्गत कार्यालयांमध्ये झालेले बदल - |
|---|---|---|---|---|---|
| अ. क्र. | विभाग कार्यालय | उप विभाग कार्यालय | विभाग कार्यालय | उप विभाग कार्यालय | |
| B-3 | | इमारती व रस्ते उपविभाग, रवाळजे (बांधकाम) | | भिरा जलविद्युत प्रकल्प उपविभाग, रवाळजे (विद्युत) | उपविभागाच्या नावात व कार्यप्रकारात बदल. |
| C | पालघर पाटबंधारे विभाग, मनोर, जि.पालघर (सिंचन) | ---- | पालघर पाटबंधारे विभाग, मनोर, जि.पालघर (सिंचन) | ---- | ----- |
| C-१ | | भातसा कालवा उ.वि.क्र.१०, धोंडावडवली, जि.ठाणे (बांधकाम) | | पाटबंधारे बांधकाम उपविभाग, मनोर (बांधकाम) | उपविभागांतर्गत सूर्या प्रकल्पाची कामे या विभागांतर्गत संलग्न. तसेच उपविभागाच्या नावात व मुख्यालयात बदल. |
| | | लघु पाटबंधारे सर्वेक्षण उपविभाग, जव्हार. (बांधकाम) | | वर्ग | उप विभागीय कार्यालय अस्तित्वातील कामे/ आस्थापनेसह उत्तर कोकण पाटबंधारे प्रकल्प मंडळ, कळवा-ठाणे अंतर्गतच्या पालघर पाटबंधारे प्रकल्प बांधकाम विभाग, सूर्यानगर अंतर्गत वर्ग. |
| | | भातसा कालवा उपविभाग क्र.५, पडघा, जि.ठाणे. (बांधकाम) | | वर्ग. | उप विभागीय कार्यालय अस्तित्वातील कामे/ आस्थापनेसह उत्तर कोकण पाटबंधारे प्रकल्प मंडळ, कळवा-ठाणे अंतर्गतच्या पाटबंधारे प्रकल्प बांधकाम विभाग, शहापूर अंतर्गत वर्ग. |
| | | भातसा संपर्क उपविभाग, ठाणे. (बांधकाम) | | वर्ग. | तांत्रिक कक्ष (जलआराखडा), ठाणे या नावाने मंडळ कार्यालयाच्या अधिनस्त कार्यान्वित करणे. |
| | | भातसा कालवा उ.वि.क्र.४, वासिंद, जि.ठाणे. (बांधकाम) | | वर्ग. | तांत्रिक कक्ष (जलआराखडा), कोकण प्रदेश, मुंबई या नावाने मुख्य अभियंता, कोकण प्रदेश, मुंबई अधिनस्त संलग्न. |
| D | भातसा धरण व्यवस्थापन विभाग, भातसानगर (सिंचन) | ---- | भातसा धरण व्यवस्थापन विभाग, भातसानगर (सिंचन) | ---- | ---- |
| | | भातसा धरण उपविभाग क्र.१(अ), भातसानगर (बांधकाम) | | वर्ग | उपविभाग उत्तर कोकण पाटबंधारे प्रकल्प मंडळ, कळवा ठाणे अधिनस्त पाटबंधारे प्रकल्प बांधकाम विभाग, शहापूर अंतर्गत वर्ग. |
| D-1 | | भातसा धरण उपविभाग क्र.१(ई), भातसानगर (बांधकाम) | | मुमरी प्रकल्प बांधकाम उपविभाग, भातसानगर (बांधकाम) | उपविभागांतर्गत मुमरी प्रकल्पाची कामे संलग्न. तसेच उपविभागाच्या नावात बदल. |
| D-2 | | भातसा कालवा उपविभाग क्र.१, शहापूर (बांधकाम) | | भातसा डावा कालवा उवि., शहापूर (बांधकाम) | उपविभागांतर्गत बीरवाडी उपसा सिंचन योजनेची कामे संलग्न. तसेच उपविभागाच्या नावात बदल. |
| | | घाटघर उदंचन जलविद्युत प्रकल्प उपविभाग क्र.३, भंडारदरा (विद्युत) | | वर्ग | उपविभागीय कार्यालय अस्तित्वातील कामे/ आस्थापनेसह याच मंडळांतर्गत ठाणे पाटबंधारे विभाग, ठाणे अंतर्गत वर्ग. |
| | | घाटघर उदंचन जलविद्युत प्रकल्प गुण नियंत्रण उपविभाग क्र.४, चोंढे (विद्युत) | | वर्ग | |

| सध्याची कार्यालयाची रचना | | | बदलानंतरची कार्यालयीन रचना | | मंडळ व मंडळांतर्गत कार्यालयांमध्ये झालेले बदल - |
|---|---|---|---|---|---|
| अ. क्र. | विभाग कार्यालय | उप विभाग कार्यालय | विभाग कार्यालय | उप विभाग कार्यालय | |
| E | जलविघुत प्रकल्प अन्वेषण विभाग क्र.१ भातसानगर (विद्युत) | ---- | वर्ग करणे | ---- | विभाग व अंतर्गतच्या उपविभाग कार्यालयांतर्गतची जलविद्युत सर्वेक्षण व अन्वेषणाची कामे बहुतांशी पूर्ण होऊन विभागांतर्गत पुरेसा कार्यभार नसल्याने, विभागीय कार्यालय उत्तर कोकण पाटबंधारे प्रकल्प मंडळ, कळवा-ठाणे अंतर्गत वर्ग. |
| | | जलविघुत प्रकल्प अन्वेषण उपविभाग क्र.१ (अ), भातसानगर (सर्वेक्षण व अन्वेषण) | | वर्ग. | उपविभागीय कार्यालय अस्तित्वातील कामे/ आस्थापनेसह याच मंडळांतर्गत ठाणे पाटबंधारे विभाग, ठाणे अंतर्गत वर्ग. |
| | | जलविद्युत प्रकल्प अन्वेषण उपविभाग क्र.१-(ब), कोलाड (सर्वेक्षण व अन्वेषण) | | वर्ग. | उत्तर कोकण पाट. मंडळांतर्गतच्या सर्वेक्षण व अन्वेषण कामासाठी रायगड पाटबंधारे विभाग क्र.२, कोकण भवन, नवी मुंबई या विभागांतर्गत वर्ग. |
| | | जलविघुत प्रकल्प अन्वेषण उपविभाग क्र.१ (ई), देवरुख (सर्वेक्षण व अन्वेषण) | | वर्ग | रत्नागिरी पाटबंधारे मंडळ, रत्नागिरी अंतर्गत सर्वेक्षण व अन्वेषण कामासाठी पाटबंधारे प्रकल्प बांधकाम विभाग, रत्नागिरी या विभागांतर्गत वर्ग. |
| F | संकल्पचित्र विभाग, कोकण प्रदेश, कोकण भवन, नवी मुंबई | ---- | कोकण संकल्पचित्र विभाग, कोकण भवन, नवी मुंबई | ---- | नावात बदल. |
| एकूण | ६ | १७ | ४ | १० | |

Sangeeta M Kholgadge

Digitally signed by Sangeeta M Kholgadge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SECTION OFFICER, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=24b378b1cb0f3c9d70d93261e45c83a11f0c2bbeb199c1858522d36476761396, cn=Sangeeta M Kholgadge
Date: 2017.03.08 12:21:11 +05'30'

(सं.म.खोलगाडगे)

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

(शासन निर्णय क्रमांक : आढावा-२०१६/प्र.क्र.२९८/२०१६/ आ. (प्रशि.), दिनांक ०७.०३.२०१७ सोबतचे प्रपत्र-ड)

## उतर कोंकण पाटबंधारे प्रकल्प मंडळ, कळवा (बांधकाम)

| सध्याची कार्यालयाची रचना | | | बदलानंतरची कार्यालयाची रचना | | मंडळ व मंडळांतर्गत कार्यालयांमध्ये झालेले बदल |
|---|---|---|---|---|---|
| अ.क्र. | विभाग कार्यालय | उप विभाग कार्यालय | विभाग कार्यालय | उप विभाग कार्यालय | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| | मंडळांतर्गतचा उप विभाग | संकल्पचित्र उपविभाग, कळवा | मंडळांतर्गतचा उप विभाग | तांत्रिक कक्ष, कळवा | उप विभागाच्या नावात बदल. |
| A | रायगड पाटबंधारे विभाग क्र.२, कोंकणभवन (बांधकाम) | ---- | रायगड पाटबंधारे विभाग क्र.२, कोंकणभवन (बांधकाम) | ---- | ---- |
| A-1 | | लघु पाटबंधारे उपविभाग, कर्जत (बांधकाम) | | रायगड लघु पाटबंधारे उपविभाग क्र.१, कर्जत | उपविभागांतर्गत पाली, भुतावली व कर्जत तालुक्यातील प्रकल्पांची कामे संलग्न. तसेच उपविभागाच्या नावात बदल. |
| | | लघु पाटबंधारे उपविभाग, वाडा (बांधकाम) | | वर्ग. | मंडळांतर्गत संलग्न झालेल्या पालघर पाटबंधारे प्रकल्प बांधकाम विभाग, सूर्यानगर अंतर्गत अस्तित्वातील कार्यभारासह वर्ग. |
| | | हेटवणे प्रकल्प उपविभाग क्र.६, वाशिंद, शहापूर (बांधकाम) | | वर्ग. | उपविभाग याच मंडळांतर्गतच्या पाटबंधारे प्रकल्प बांधकाम विभाग, शहापूर अंतर्गत वर्ग. |
| A-2 | | पाटबंधारे प्रकल्प अन्वेषण उपविभाग क्र.२, कर्जत (बांधकाम). | | रायगड लघु पाटबंधारे उप विभाग क्र.२, कर्जत (बांधकाम) | उपविभागांतर्गत कोंडणे, ता.कर्जत, जि.रायगड प्रकल्पाची कामे संलग्न. तसेच उप विभागाच्या नावात बदल. |
| | | लघु पाटबंधारे उपविभाग, मनोर (बांधकाम) | | वर्ग. | उपविभाग याच मंडळांतर्गत संलग्न झालेल्या पालघर पाटबंधारे प्रकल्प बांधकाम विभाग, सूर्यानगर या विभागांतर्गत अंतर्गत वर्ग. |
| | | जलसंपत्ती उप विभाग क्र.२ कळवा, ठाणे (बांधकाम) | | वर्ग. | उपविभाग याच मंडळांतर्गतच्या पाटबंधारे प्रकल्प बांधकाम विभाग, शहापूर अंतर्गत वर्ग. |
| A-3 | | ---- | | रायगड लघु पाटबंधारे उपविभाग क्र.३, कोलाड (बांधकाम) | ठाणे पाटबंधारे मंडळ, ठाणे अंतर्गतच्या रायगड पाटबंधारे विभाग, कोलाड या विभागीय कार्यालयांतर्गतचा लघु पाटबंधारे उपविभाग, कोलाड हे उप विभागीय कार्यालय अस्तित्वातील व बाळगंगा प्रकल्पाच्या कामांसह तसेच कार्यालयीन अभिलेख व मंजूर आस्थापनेसह या विभागांतर्गत संलग्न. तसेच उपविभागाच्या नावात, मंडळ व विभागीय नियंत्रणात बदल. |
| A-4 | | ---- | | जलसंपत्ती सर्वेक्षण व अन्वेषण उपविभाग, कोलाड (बांधकाम) | ठाणे पाटबंधारे मंडळ, ठाणे अंतर्गतच्या जलविद्युत प्रकल्प अन्वेषण विभाग क्र.१, भातसानगर या विभागीय कार्यालयांतर्गतचा भातसा जलविद्युत प्रकल्प अन्वेषण उवि., क्र.१(ब), कोलाड हे उप विभागीय कार्यालय या विभागांतर्गत संलग्न. तसेच उपविभागाच्या नावात, मंडळ व विभागीय नियंत्रणात बदल. |

| सध्याची कार्यालयाची रचना | | | बदलानंतरची कार्यालयाची रचना | | मंडळ व मंडळांतर्गत कार्यालयांमध्ये झालेले बदल |
|---|---|---|---|---|---|
| अ.क्र. | विभाग कार्यालय | उप विभाग कार्यालय | विभाग कार्यालय | उप विभाग कार्यालय | |
| B | हेटवणे मध्यम प्रकल्प विभाग, कामार्ली (बांधकाम) | ---- | हेटवणे मध्यम प्रकल्प विभाग, कामार्ली (बांधकाम) | ---- | ---- |
| B-1 | | हेटवणे मध्यम प्रकल्प उपविभाग क्र.४ कामार्ली (बांधकाम) | | हेटवणे मध्यम प्रकल्प उपविभाग क्र.४, कामार्ली (बांधकाम) | उपविभागांतर्गत पोलादपूर तालुक्यातील काळवली-धारवली व पेण तालुक्यातील हेटवणे मध्यम प्रकल्प इ. कामे संलग्न. |
| B-2 | | हेटवणे प्रकल्प उपविभाग क्र.५, कामार्ली (बांधकाम) | | हेटवणे प्रकल्प उपविभाग क्र.५, कामार्ली (बांधकाम) | उपविभागांतर्गत श्रीवर्धन तालुक्यातील हरीहरेश्वर-मारळ, वडशेतवावे येथील प्रकलपाची कामे संलग्न. |
| B-3 | | लघु पाटबंधारे सर्वेक्षण उपविभाग, अलिबाग (पेण) (बांधकाम) | | हेटवणे मध्यम प्रकल्प उपविभाग, उंबर्डे (बांधकाम) | उप विभागांतर्गत हेटवणे प्रकल्प उजवा डावा कालवा ता.पेण येथील प्रकल्पाची कामे संलग्न तसेच उपविभागाच्या नाव व मुख्यालयात बदल. |
| B-4 | | ---- | | हेटवणे मध्यम प्रकल्प उप विभाग, महाड (बांधकाम) | महाड तालुक्यातील कोथेरी, अंबोली, नागेश्वरी प्रकल्पांच्या कामांसाठी मंडळांतर्गतच्या हेटवणे कालवा विभाग क्र.१, कोलाड अंतर्गतचा लघु पाटबंधारे सर्वेक्षण उपविभाग, महाड या विभागांतर्गत संलग्न. तसेच उपविभागाच्या नावात व विभागीय नियंत्रणात बदल. |
| C | हेटवणे कालवा विभाग क्र.१, कोलाड (बांधकाम) | ---- | पाटबंधारे प्रकल्प बांधकाम विभाग, शहापूर, ता. शहापूर, जि.ठाणे (बांधकाम) | ---- | भातसा व सूर्या हे मोठे प्रकल्प तसेच काळ व कुभे हे जलविद्युत प्रकल्प वगळता ठाणे, रायगड व पालघर या चार जिल्ह्यातील उर्वरित बांधकामाधीन प्रकल्पाची कामे या विभागांतर्गत संलग्न तसेच विभागीय कार्यालयाच्या नावात व मुख्यालयात बदल. |
| | | लघु पाटबंधारे सर्वेक्षण उपविभाग, महाड (बांधकाम) | | वर्ग. | सदर उपविभाग याच मंडळांतर्गतच्या हेटवणे मध्यम प्रकल्प विभाग, कामार्ली या विभागांतर्गत वर्ग. |
| C-1 | | ---- | | पाटबंधारे प्रकल्प बांधकाम उपविभाग, कळवा-ठाणे (बांधकाम) | या मंडळ कार्यालयांतर्गतच्या रायगड पाटबंधारे विभाग क्र.२, कोकण भवन, नवी मुंबई अंतर्गतचे जलसंपत्ती उपविभाग क्र.२, कळवा-ठाणे हे उपविभागीय कार्यालय या विभागांतर्गत मंजूर आस्थापनेसह अंबरनाथ तालुक्यातील कुशीवाल प्रकल्पाच्या कामांसाठी संलग्न. तसेच उपविभागाच्या नावात व विभागीय नियंत्रणात बदल. |
| C-2 | | ---- | | पाटबंधारे प्रकल्प बांधकाम उपविभाग क्र.१, वाशिंद (बांधकाम) | ठाणे पाटबंधारे मंडळ, ठाणे अधिनस्त कार्यरत असलेल्या भातसा धरण व्यवस्थापन विभाग, भातसानगर अंतर्गतचे भातसा धरण उपविभाग क्र.१ (अ), भातसानगर (बांधकाम) हे उपविभागीय कार्यालय अस्तित्वातील कार्यभार व मंजूर आस्थापनेसह या विभागांतर्गत मुरबाड तालुक्यातील काळू, पवाळे प्रकल्पाच्या कामासाठी संलग्न. तसेच उपविभागाच्या नावात, मंडळीय व विभागीय नियंत्रणात बदल. |

| सध्याची कार्यालयाची रचना | | | बदलानंतरची कार्यालयाची रचना | | मंडळ व मंडळांतर्गत कार्यालयांमध्ये झालेले बदल |
|---|---|---|---|---|---|
| अ.क्र. | विभाग कार्यालय | उप विभाग कार्यालय | विभाग कार्यालय | उप विभाग कार्यालय | |
| C-3 | | ---- | | पाटबंधारे प्रकल्प बांधकाम उपविभाग क्र.२, वाशिंद (बांधकाम) | या मंडळ कार्यालयांतर्गतच्या रायगड पाटबंधारे विभाग क्र.२, कोकण भवन, नवी मुंबई अंतर्गतचे हेटवणे मध्यम प्रकल्प उपविभाग क्र.६, वाशिंद-शहापूर हे उपविभागीय कार्यालय मंजूर आस्थापनेसह शहापूर तालुक्यातील शाई, नामपाडा प्रकल्पाच्या कामांसाठी या विभागांतर्गत संलग्न. तसेच उपविभागाच्या नावात व विभागीय नियंत्रणात बदल. |
| C-4 | | ---- | | पाटबंधारे प्रकल्प बांधकाम उपविभाग क्र.३, पडघा, जि.ठाणे. (बांधकाम) | ठाणे पाटबंधारे मंडळ, ठाणे अधिनस्त कार्यरत पालघर पाटबंधारे विभाग, मनोर, जि.पालघर या विभागीय कार्यालयांतर्गतचे भातसा कालवा उवि.क्र.५, पडघा (बांधकाम) हे उपविभागीय कार्यालय अस्तित्वातील कार्यभार/ मंजूर आस्थापनेसह या विभागांतर्गत मुरबाड तालुक्यातील पाडाळे प्रकल्पाच्या कामासाठी संलग्न. तसेच उपविभागाच्या नावात, मंडळीय व विभागीय नियंत्रणात बदल. |
| D | लघु पाटबंधारे विभाग, चिपळूण (बांधकाम) | | **वर्ग करणे प्रस्तावित** | | या विभागीय व अंतर्गतच्या उपविभागीय कार्यालयांचे मुख्यालय व कार्यक्षेत्र हे मंडळ कार्यालयाच्या मुख्यालयांपासून जास्त अंतरावर असल्याने, प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने रत्नागिरी पाटबंधारे मंडळ, रत्नागिरी अंतर्गत वर्ग. |
| | | पिंपळवाडी प्रकल्प उपविभाग, खोपी (बांधकाम) | | वर्ग. | |
| | | लघु पाटबंधारे सर्वेक्षण उपविभाग, भरणे (बांधकाम) | | वर्ग. | |
| | | गडगडी प्रकल्प उपविभाग, देवरुख (बांधकाम) | | वर्ग. | |
| | | नातुवाडी प्रकल्प उपविभाग क्र.२, कुचांबे (चिपळूण) (बांधकाम) | | वर्ग. | |
| | | नातुवाडी प्रकल्प उपविभाग क्र.४, आरवली (बांधकाम) | | वर्ग. | |
| E | | ----- | **पालघर पाटबंधारे प्रकल्प बांधकाम विभाग, सुर्यानगर, ता.डहाणू, पालघर** (बांधकामासाठी रुपांतरीत) | ----- | ठाणे पाटबंधारे मंडळ, ठाणे अंतर्गतच्या जलविद्युत प्रकल्प अन्वेषण विभाग क्र.१ भातसानगर (विद्युत) या विभागीय कार्यालयांतर्गतची जलविद्युत सर्वेक्षण व अन्वेषणाची बहुतांशी कामे पूर्ण झाल्याने उ.को.पाट.प्रकल्प मंडळांतर्गतची प्रकल्पिय बांधकामाधीन कामे पूर्ण करण्यासाठी विभागीय कार्यालय या मंडळांतगत संलग्न. तसेच विभागाच्या कार्यप्रकारात, नावात व मंडळीय नियंत्रणात बदल. |

| सध्याची कार्यालयाची रचना | | | बदलानंतरची कार्यालयाची रचना | | मंडळ व मंडळांतर्गत कार्यालयांमध्ये झालेले बदल |
|---|---|---|---|---|---|
| अ.क्र. | विभाग कार्यालय | उप विभाग कार्यालय | विभाग कार्यालय | उप विभाग कार्यालय | |
| E-1 | | | | पालघर पाटबंधारे बांधकाम उपविभाग, वाडा (बांधकाम) | निंबापूर-डहाणू, खोलसापाडा-१ वसई सुसरी-डहाणू या प्रकल्पाच्या कामांसाठी या मंडळाधिनस्त कार्यरत असलेल्या रायगड पाटबंधारे विभाग क्र.२, कोकण भवन, नवी मुंबई अंतर्गतचे लघु पाटबंधारे उपविभाग, वाडा हे उपविभागीय कार्यालय अस्तित्वातील कार्यभार व आस्थापनेसह या विभागांतर्गत संलग्न. तसेच उपविभागाच्या नावात व विभागीय नियंत्रणात बदल. |
| E-2 | | | | पालघर पाटबंधारे प्रकल्प बांधकाम उपविभाग, मनोर (बांधकाम) | वाघ प्रकल्प ता.मोखाडा व देहरजी, ता.विक्रमगड या प्रकल्पाच्या कामांसाठी या मंडळाधिनस्त कार्यरत असलेल्या रायगड पाटबंधारे विभाग क्र.२, कोकण भवन, नवी मुंबई अंतर्गतचे लघु पाटबंधारे उपविभाग, मनोर हे उपविभागीय कार्यालय अस्तित्वातील कार्यभार व आस्थापनेसह या विभागांतर्गत संलग्न. तसेच उपविभागाच्या नावात व विभागीय नियंत्रणात बदल. |
| E-3 | | ----- | | पालघर पाटंधारे बांधकाम उपविभाग, जव्हार. (बांधकाम) | ठाणे पाटबंधारे मंडळ, ठाणे अधिनस्त कार्यरत पालघर पाटबंधारे विभाग, मनोर, जि.पालघर या विभागीय कार्यालयांतर्गतचे लघु पाट.सेर्वेक्षण उवि., जव्हार (बांधकाम) हे उपविभागीय कार्यालय अस्तित्वातील कार्यभारासह या विभागांतर्गत जव्हार तालुक्यातील लेंडी, डोमहिरा प्रकल्पाच्या कामांसाठी संलग्न. तसेच उप विभागाच्या नावात, मंडळीय व विभागीय नियंत्रणात बदल. |
| एकूण | ४ | १६ | ४ | १६ | |

Sangeeta M Kholgadge

Digitally signed by Sangeeta M Kholgadge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SECTION OFFICER, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=24b378b1cb0f3c9d70d93261e45c83a11f0c2bbeb199c1858522d36476761396, cn=Sangeeta M Kholgadge
Date: 2017.03.08 12:24:32 +05'30'

(सं.म.खोलगाडगे)

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

(शासन निर्णय क्रमांक : आढावा-२०१६/प्र.क्र.२९८/२०१६/ आ. (प्रशि.), दिनांक ०७.०३.२०१७ सोबतचे प्रपत्र-इ)

रत्नागिरी पाटबंधारे मंडळ, रत्नागिरी ( सिंचन)

| सध्याची कार्यालयाची रचना | | | बदलानंतरची कार्यालयाची रचना | | मंडळ व मंडळांतर्गत कार्यालयांमध्ये झालेले बदल - |
|---|---|---|---|---|---|
| अ.क्र. | विभाग कार्यालय | उप विभाग कार्यालय | विभाग कार्यालय | उप विभाग कार्यालय | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| | | ------ | ------ | ------ | तिलारी प्रकल्पांतर्गतच्या दोन धरणांची बहुतांश कामे पूर्ण झाल्याने ८ पैकी ४ उप विभागीय कार्यालये (१) तिलारी वसाहत उपविभाग, तिलारीनगर (२) तिलारी शीर्षकामे उपविभाग क्र.१, कोनाळकट्टा (३) तिलारी शीर्षकामे उपविभाग क्र.३, कोनाळकट्टा व (४) कर्मशाळा उपविभाग, कोनाळकट्टा-तिलारीवाडी या उपविभागांसह तिलारी शीर्षकामे विभाग क्र.१, कोनाळकट्टा हे विभागीय कार्यालय शासन आदेश क्र.आढावा २०१६/ प्रक्र.२०/ २०१६/ आ.(प्रशि.), दि.२७.०१.२०१६ अन्वये तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव अंतर्गत वर्ग करण्यात आले आहे. त्यामुळे विभागांतर्गतचे उर्वरित चार उपविभागीय कार्यालये अन्यत्र वर्ग करणे. |
| | | तिलारी मुख्य धरण उपविभाग, तिलारीनगर (विद्युत) | | वर्ग. | उपविभाग अस्तित्वातील तसेच तिलारी वसाहत उवि, तिलारीनगर या बंद झालेल्या उपविभागाकडील उर्वरित कार्यभारासह व शिर्षखणी धरण व धामणे धरणाच्या कामासह दक्षिण कोकण पाटबंधारे प्रकल्प मंडळ, ओरोस या मंडळांतर्गत संलग्न होणाऱ्या सिंधुदुर्ग पाटबंधारे प्रकल्प बांधकाम विभाग, चराठे-सावंतवाडी या विभागांतर्गत वर्ग. |
| | | तिलारी शीर्षकामे उपविभाग क्र.२, कोनाळकट्टा (बांधकाम) | | वर्ग. | सदर उपविभाग अस्तित्वातील कार्यभार व मंजूर आस्थापनेसह दक्षिण कोकण पाटबंधारे प्रकल्प मंडळ, ओरोस अंतर्गत संलग्न होणाऱ्या सिंधुदुर्ग पाटबंधारे प्रकल्प बांधकाम विभाग, चराठे-सावंतवाडी या विभागांतर्गत वर्ग. |
| | | गुण नियंत्रण उपविभाग, कोनाळकट्टा. (बांधकाम) | | वर्ग. | |
| | | तिलारी शीर्षकामे उपविभाग क्र.५, कोनाळकट्टा (बांधकाम) | | वर्ग. | |
| | तिलारी कालवा विभाग क्र.१, चराठे, सावंतवाडी (बांधकाम) | ---- | वर्ग. | ---- | या विभागीय कार्यालयामधील व रत्नागिरी पाटबंधारे मंडळ कार्यालयामधील अंतर जास्त असल्याने त्याचप्रमाणे विभागीय व अंतर्गतच्या उपविभागीय कार्यालयांचे कार्यक्षेत्र हे सिंधुदुर्ग जिल्ह्यातील असल्याने, विभागीय कार्यालयांतर्गतची बांधकामाधीन प्रकल्पिय कामे सुलभरित्या होण्याच्या व मंडळीय नियंत्रणाच्या दृष्टीने सदरहू विभागीय कार्यालय अंतर्गतच्या उपविभागीय कार्यालयांसह दक्षिण कोकण पाटबंधारे प्रकल्प मंडळ, ओरोस-सिंधुदुर्ग अंतर्गत अस्तित्वातील कार्यभार व मंजूर आस्थापनेसह वर्ग. |
| | | तिलारी कालवा उपविभाग क्र १ कोनाळकट्टा (बांधकाम) | | वर्ग. | |
| | | तिलारी कालवा उपविभाग क्र २ कोनाळकट्टा (बांधकाम) | | वर्ग. | |
| | | तिलारी कालवा उपविभाग क्र ३ कोनाळकट्टा (बांधकाम) | | वर्ग. | |

| सध्याची कार्यालयाची रचना | | | बदलानंतरची कार्यालयाची रचना | | मंडळ व मंडळांतर्गत कार्यालयांमध्ये झालेले बदल - |
|---|---|---|---|---|---|
| अ.क्र. | विभाग कार्यालय | उप विभाग कार्यालय | विभाग कार्यालय | उप विभाग कार्यालय | |
| | | तिलारी कालवा उपविभाग क्र ४ कोनाळकट्टा (बांधकाम) | | वर्ग. | |
| A | पाटबंधारे प्रकल्प बांधकाम विभाग रत्नागिरी (बांधकाम) | ---- | पाटबंधारे प्रकल्प बांधकाम विभाग रत्नागिरी (बांधकाम) | ---- | ---- |
| A-1 | | लघु पाटबंधारे बांधकाम उपविभाग, करक (लांजा) (बांधकाम) | | पाटबंधारे प्रकल्प बांधकाम उपविभाग, करक (बांधकाम) | उपविभागांतर्गत अर्जुना मध्यम पाटबंधारे प्रकल्पाची शिर्षकामे, पुर्नवसन कामे व प्रकल्पांतर्गतची उजवा कालवा आणि वितरण व्यवस्था इ. कामे संलग्न, तसेच उपविभागाच्या नावात बदल. |
| A-2 | | पाटबंधारे बांधकाम उपविभाग क्र.१, लांजा (बांधकाम) | | पाटबंधारे बांधकाम उपविभाग क्र.१, लांजा (बांधकाम) | उपविभागांतर्गत अर्जुना मध्यम पाटबंधारे प्रकल्पाच्या डाव्या कालव्याची व वितरण व्यवस्थेची कामे, तसेच रत्नागिरी जिल्ह्यातील लांजा व राजापूर या तालुक्यांमधील सर्वेक्षणाची कामे, त्याचप्रमाणे वैभववाडी तालुक्यातील वाभवे योजनांच्या प्रशासकीय मान्यतेची अंदाजपत्रके तयार करणे इ. कामे संलगन. |
| A-3 | | पाटबंधारे बांधकाम उपविभाग क्र.२, लांजा (बांधकाम) | | पाटबंधारे बांधकाम उपविभाग क्र.२, लांजा (बांधकाम) | उपविभागांतर्गत अस्तित्वातील कामासह मुचकुंदी बृहत लघु पाटबंधारे प्रकल्प, चिंचवाडी लघु पाटबंधारे प्रकल्पांची बांधकामे इत्यादी कामे संलग्न. |
| | | पाटबंधारे बांधकाम उपविभाग कणकवली (बांधकाम) | | वर्ग. | सदर उपविभाग कोर्ले सांतडी या प्रकल्पांच्या कामासाठी दक्षिण कोकण पाटबंधारे प्रकल्प मंडळ, ओरोस अंतर्गतच्या लघु पाटबंधारे विभाग, आरोस अंतर्गत अस्तित्वातील कार्यभार, कार्यालयीन अभिलेख व मंजूर आस्थापनेसह वर्ग. |
| | | नातुवाडी प्रकल्प उपविभाग क्र.३, भरणे (बांधकाम) | | वर्ग. | उत्तर कोकण पाट. प्रकल्प मंडळ, कळवा-ठाणे यांच्याकडून या मंडळास संलग्न केलेल्या पाटबंधारे प्रकल्प बांधकाम विभाग, चिपळूण (लपावि,चिपळूण) अंतर्गत अस्तित्वातील कार्यभार, कार्यालयीन अभिलेख व मंजूर आस्थापनेसह वर्ग. |
| A-4 | | ---- | | पाटबंधारे प्रकल्प बांधकाम उपविभाग क्र.३, लांजा (बांधकाम) | उपविभाग बेर्डेवाडी लघु पाटबंधारे आसगा (हासोळ) हासोळ, चव्हाणवाडी योजनांच्या कामांसाठी दक्षिण पाटबंधारे प्रकल्प मंडळ, ओरोस अधिनस्त कार्यरत असलेल्या लघु पाटबंधारे विभाग, ओरोस या विभागांतर्गचे लघु पाटबंधार सर्वेक्षण उपविभाग, लांजा (बांधकाम) हे उपविभागीय कार्यालय प्रशासकीय सोयीच्या व कार्यक्षेत्राच्या दृष्टीने या विभागांतर्गत संलग्न. तसेच उपविभागाच्या नाव, कार्यप्रकार मंडळीय व विभागीय नियंत्रणात बदल. |

| सध्याची कार्यालयाची रचना | | | बदलानंतरची कार्यालयाची रचना | | मंडळ व मंडळांतर्गत कार्यालयांमध्ये झालेले बदल - |
|---|---|---|---|---|---|
| अ.क्र. | विभाग कार्यालय | उप विभाग कार्यालय | विभाग कार्यालय | उप विभाग कार्यालय | |
| A-5 | | ---- | | जलसंपत्ती सर्वेक्षण व अन्वेषण उपविभाग, देवरुख (सर्वेक्षण व अन्वेषण) | चितळे समितीच्या ४२ सुधारणा शिफारशीनुसार ठाणे पाटबंधारे मंडळाधिनस्तच्या जलविद्युत प्रकल्प अन्वेषण विभाग क्र.१, भातसानगर अंतर्गचे जलविद्युत प्रकल्प अन्वेषण उपविभाग क्र.१, (ई), देवरुख-रत्नागिरी हे उपविभागीय कार्यालय रत्नागिरी जिल्ह्यातील सर्वेक्षण व अन्वेषण कामासाठी या विभागांतर्गत संलग्न. तसेच उपविभागाच्या नावात, मंडळीय व विभागीय नियंत्रणात बदल. |
| B | ----- | ----- | पाटबंधारे प्रकल्प बांधकाम विभाग, चिपळूण (बांधकाम) | | उत्तर कोकण पाटबंधारे प्रकल्प मंडळांतर्गतचे लघु पाटबंधारे विभाग, चिपळूण (बांधकाम) व त्यांतर्गतची ५ उप विभाग कार्यालये अस्तित्वातील कार्यभार व मंजूर आस्थापनेसह या मंडळांतर्गत संलग्न. |
| B-1 | | ----- | | पाटबंधारे प्रकल्प बांधकाम उपविभाग, खोपी (बांधकाम) | पिंपळवाडी प्रकल्प उपविभाग, खोपी नावाने कार्यरत असलेला उपविभाग पोयनार, पिंपळवाडी व शेलारवाडी येथील लघु पाटबंधारे योजनांच्या कामासाठी अस्तित्वातील कार्यभारासह संलग्न. तसेच उपविभागाच्या नावात बदल. |
| B-2 | | ----- | | पाटबंधारे प्रकल्प बांधकाम उपविभाग क्र.१, भरणे (खेड) (बांधकाम) | लघु पाटबंधारे सर्वेक्षण उपविभाग, भरणे नावाने कार्यरत असलेला उपविभाग तळवट, न्यू-मांडवे, कुडुप येथील लघु पाटबंधारे योजनांच्या कामासाठी अस्तित्वातील कार्यभारासह संलग्न. तसेच उपविभागाच्या नावात बदल. |
| B-3 | | | | गडनदी प्रकल्प उपविभाग, कुचांबे (संगमेश्वर) (बांधकाम) | नातुवाडी प्रकल्प उपविभाग क्र.२, कुचांबे (चिपळूण) नावाने कार्यरत असलेला उपविभाग गडनदी, जामदा येथील मध्यम प्रकल्प कामासाठी अस्तित्वातील कार्यभारासह संलग्न. तसेच उपविभागाच्या नावात बदल. |
| B-4 | | ----- | | गडगडी प्रकल्प उपविभाग, देवरुख (बांधकाम) | उपविभागांतर्गत गडनदी लघु पाटबंधारे योजनेची कामे व अस्तित्वातील कार्यभार संलग्न. |
| B-5 | | ----- | | पाटबंधारे बांधकाम उपविभाग, आरवली (बांधकाम) | नातुवाडी प्रकल्प उपविभाग क्र.४, आरवली या नावाने कार्यरत असलेला उपविभाग साखरपा, रांगव प्रकल्पाच्या कामासाठी अस्तित्वातील कार्यभारासह संलग्न. तसेच उपविभागाच्या नावात बदल. |

| सध्याची कार्यालयाची रचना | | | बदलानंतरची कार्यालयाची रचना | | मंडळ व मंडळांतर्गत कार्यालयांमध्ये झालेले बदल - |
|---|---|---|---|---|---|
| अ.क्र. | विभाग कार्यालय | उप विभाग कार्यालय | विभाग कार्यालय | उप विभाग कार्यालय | |
| B-6 | | ----- | | नातूवाडी प्रकल्प उपविभाग क्र.३, भरणे (बांधकाम) | तिडे, किंजळे, येलोंदवाडी या लघु पाटबंधारे प्रकल्पाच्या तसेच दापोली, गुहागर, मंडणगड, खेड व चिपळूण या तालुक्यांमधील सर्वेक्षणाच्या कामांसाठी प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने सदर उपविभाग मंडळांतर्गच्या पाटबंधारे प्रकल्प बांधकाम विभाग, रत्नागिरी यांचेकडून अस्तित्वातील कार्यभारासह व मंजूर आस्थापनेसह या विभागास संलग्न. |
| एकूण | २ | १३ | २ | ११ | |
| | | | | | |
| | | | | | Sangeeta M Kholgadge |
| | | | | | Digitally signed by Sangeeta M Kholgadge DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SECTION OFFICER, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=24b378b1cb0f3c9d70d93261e45c83a11f0c2bbeb199c1858522d36476761396, cn=Sangeeta M Kholgadge Date: 2017.03.08 12:28:20 +05'30' |
| | | | | | |
| | | | | | (सं.म.खोलगाडगे) |
| | | | | | कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन |

| (शासन निर्णय क्रमांक : आढावा-२०१६/प्र.क्र.२९८/२०१६/ आ.(प्रशि.), दिनांक ०७.०३.२०१७ सोबतचे प्रपत्र-ई) | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| दक्षिण कोंकण पाटबंधारे प्रकल्प, मंडळ, ओरोस (सिंधुदुर्गनगरी) ( बांधकाम) | | | | | |
| सध्याची कार्यालयाची रचना | | | बदलानंतरची कार्यालयाची रचना | | मंडळ व मंडळांतर्गत कार्यालयांमध्ये झालेले बदल - |
| अ. क्र. | विभाग कार्यालय | उप विभाग कार्यालय | विभाग कार्यालय | उप विभाग कार्यालय | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| | | ---- | | ---- | उपविभागीय कार्यालयांचे तळंबा मोठा प्रकल्प पाटबंधारे विभाग, आंबडपाल-कुडाळ हे विभागीय कार्यालय शासन निर्णय दि.२२.०७.२०१६ अन्वये सिंचन व्यवस्थापन कामासाठी रत्नागिरी पाटबंधारे मंडळ, रत्नागिरी अंतर्गत वर्ग झाल्याने विभागांतर्गत कार्यरत ४ उपविभाग या मंडळांतर्गत अन्य विभाग कार्यालयांच्या नियंत्रणाखाली संलग्न. |
| | | तळंबा मोठा पाटबंधारे प्रकल्प उपविभाग क्र. १ केरवडे ता. कुडाळ (बांधकाम) | | वर्ग. | सदर उपविभागीय कार्यालये या मंडळांतर्गतच्या मध्यम प्रकल्प विभाग, अंबडपाल या विभागांतर्गत वर्ग. |
| | | तळंबा मोठा पाटबंधारे प्रकल्प उपविभाग क्र. २ अंबडपाल, ता. कुडाळ (बांधकाम) | | वर्ग. | |
| | | तळंबा मोठा पाटबंधारे प्रकल्प उपविभाग क्र. ३ आंबडपाल, ता. कुडाळ (बांधकाम) | | वर्ग. | |
| | | रस्ते व इमारती उपविभाग, केरवडे ता. कुडाळ (बांधकाम) | | वर्ग. | सदर उप विभाग चितळे समितीच्या सिंचन विषयक ४२ सुधारणांतर्गत सर्वेक्षण व अन्वेषण कामासाठी याच मंडळांतर्गतच्या लघु पाटबंधारे विभाग, ओरोस या विभागांतर्गत वर्ग. |
| A | मध्यम प्रकल्प विभाग, आंबडपाल (बांधकाम) | | मध्यम प्रकल्प विभाग, आंबडपाल (बांधकाम) | | ---- |
| A-१ | | देवगड मध्यम पाटबंधारे प्रकल्प उपविभाग क्र.१, फोंडाघाट. (बांधकाम) | | देवगड मध्यम पाटबंधारे प्रकल्प उपविभाग क्र.१, फोंडाघाट. (बांधकाम) | उपविभागांतर्गत अस्तित्वातील कार्यभारासह देवघर धरण प्रकल्पाची व अरुणा कालव्याची कामे संलग्न. |
| A-२ | | देवगड मध्यम पाटबंधारे प्रकल्प उप विभाग क्र.२, फोंडाघाट. (बांधकाम) | | देवगड मध्यम पाटबंधारे प्रकल्प उप विभाग क्र. २, फोंडाघाट. (बांधकाम) | उपविभागांतर्गत अस्तित्वातील कार्यभारासह देवघर धरण प्रकल्पाची व उजव्या कालव्याची कामे संलग्न. |
| A-३ | | लघु पाटबंधारे सर्व्हेक्षण उपविभाग क्र.२, कणकवली, जानवली. (बांधकाम) | | पाटबंधारे बांधकाम उपविभाग, कणकवली, (बांधकाम) | उपविभागांतर्गत अस्तित्वातील कार्यभारासह अरुणा मध्यम प्रकल्प, तरंदळे लघु पाटबंधारे प्रकल्प, देवघर डाव्या कालव्याची कामे इ कामे संलग्न. तसेच उपविभागाच्या नावात बदल. |
| A-४ | | महमदवाडी प्रकल्प उपविभाग, आंबडपाल. (बांधकाम) | | नरडवे प्रकल्प उपविभाग, आंबडपाल. (बांधकाम) | उपविभागांतर्गत अस्तित्वातील कार्यभारासह नरडवे मध्यम प्रकल्पाच्या मुख्य धरण व रोडची कामे, तसेच सरंबळा मध्यम प्रकल्पाची कामे, शिरशिंगे पाटबंधारे प्रकल्पाची कामे इ. कामे, संलग्न. तसेच उपविभागाच्या नावात बदल. |
| A-५ | | ----- | | तळांबा मोठा पाटबंधारे प्रकल्प उपविभाग क्र.१, केरवडे, ता.कुडाळ (बांधकाम) | याच मंडळांतर्गतच्या तळंबा मोठा प्रकल्प पाटबंधारे विभाग, आंबडपाल-कुडाळ |

| सध्याची कार्यालयाची रचना | | | बदलानंतरची कार्यालयाची रचना | | मंडळ व मंडळांतर्गत कार्यालयांमध्ये झालेले बदल - |
|---|---|---|---|---|---|
| अ. क्र. | विभाग कार्यालय | उप विभाग कार्यालय | विभाग कार्यालय | उप विभाग कार्यालय | |
| A-६ | | ----- | | तळांबा मोठा पाटबंधारे प्रकल्प उपविभाग क्र.२, आंबडपाल, ता.कुडाळ (बांधकाम) | (बांध.) या विभागीय कार्यालयांतर्गतची सदरहू ३ उपविभागीय कार्यालये अस्तित्वातील कार्यभार, अभिलेख व मंजूर आस्थापनेसह या विभागांतर्गत संलग्न. तसेच उपविभागाच्या विभागीय नियंत्रणात बदल. |
| A-७ | | ----- | | तळांबा मोठा पाटबंधारे प्रकल्प उपविभाग क्र.३, आंबडपाल, ता.कुडाळ (बांधकाम) | |
| B | लघु पाटबंधारे विभाग, ओरोस (बांधकाम) | ----- | लघु पाटबंधारे विभाग, ओरोस (बांधकाम) | ----- | |
| B-१ | | लघु पाटबंधारे उपविभाग, कणकवली (बांधकाम) | | पाटबंधारे बांधकाम उपविभाग क्र.१, कणकवली (बांधकाम) | उप विभागाच्या नावात बदल. |
| | | लघु पाटबंधारे सर्वेक्षण उपविभाग, लांजा (सर्वेक्षण) | | वर्ग. | प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने उपविभागीय कार्यालय रत्नागिरी पाटबंधारे मंडळ, रत्नागिरी अंतर्गतच्या पाटबंधारे प्रकल्प बांधकाम विभाग, रत्नागिरी अंतर्गत अस्तित्वातील कार्यभार व मंजूर आस्थापनेसह वर्ग. |
| B-२ | | --- | | पाटबंधारे बांधकाम उपविभाग क्र.२, कणकवली (बांधकाम) | उपविभागीय कार्यालयाचे कार्यक्षेत्र तसेच मंडळीय व विभागीय कार्यालयांचे प्रशासकीय/ तांत्रिक नियंत्रण याबाबी विचारात घेऊन, पाटबंधारे बांधकाम उपविभाग, कणकवली हे उपविभागीय कार्यालय रत्नागिरी पाटबंधारे मंडळ, रत्नागिरी अंतर्गतच्या पाटबंधारे प्रकल्प बांधकाम विभाग, रत्नागिरी यांचेकडून अस्तित्वातील कार्यभार, कार्यालयीन अभिलेख व कोर्ले सांतडी या प्रकल्पांच्या कामासाठी या विभागांतर्गत मंजूर आस्थापनेसह संलग्न. तसेच उपविभागाच्या नावात, मंडळ व विभागीय नियंत्रण बदल) |
| B-३ | | --- | | जलसंपत्ती सर्वे. व अन्वेषण उवि., अंबडपाल, ता.कुडाळ (सर्वेक्षण व अन्वेषण) | या मंडळांतर्गतचे तळंबा मोठे प्रकल्प बांधकाम विभाग, आंबडपाल शासन निर्णय दि.२२.०७.२०१६ अन्वये सिंचन व्यवस्थापन कामासाठी रत्नागिरी पाटबंधारे मंडळ, रत्नागिरी अंतर्गत वर्ग झाल्याने या विभागाकडील रस्ते व इमारती उपविभाग, केरवडे हे कर्यालय चितळे समितीच्या सिंचन विषयक ४२ सुधारणानुसार सन्वेक्षण व अन्वेषण कामासाठी या विभागांतर्गत मंजूर आस्थापनेसह संलग्न. तसेच उपविभागाच्या नावात, कार्यप्रकार, मुख्यालयात व विभागीय नियंत्रणात बदल. |

| सध्याची कार्यालयाची रचना | | | बदलानंतरची कार्यालयाची रचना | | मंडळ व मंडळांतर्गत कार्यालयांमध्ये झालेले बदल - |
|---|---|---|---|---|---|
| अ. क्र. | विभाग कार्यालय | उप विभाग कार्यालय | विभाग कार्यालय | उप विभाग कार्यालय | |
| C | | ---- | सिंधुदुर्ग पाटबंधारे प्रकल्प बांधकाम विभाग, चराठे, सावंतवाडी (बांधकाम) | ---- | या विभागांतर्गतची प्रकल्पिय कामे सिंधुदुर्ग जिल्ह्यातील असल्याने, प्रकल्पिय कामे पूर्ण करण्यासाठी विभागाच्या व अंतर्गतच्या ४ उपविभागांच्या मंडळीय नियंत्रणात बदल आवश्यक होता. त्यामुळे तिलारी कालवा विभाग क्र.१, चराठे- सावंतवाडी हे विभागीय कार्यालय व अंतर्गतच्या ४ उप विभागांसह तसेच रत्नागिरी पाटबंधारे मंडळ, रत्नागिरी अंतर्गतच्या बंद केलेल्या तिलारी शिर्षकामे विभाग क्र.१, कोनाळकट्टा अंतर्गतच्या ४ उपविभागांसह असे एकूण ८ उपविभागांच्या अस्तित्वातील कार्यभार व अभिलेख्यांसह दक्षिण कोकण पाटबंधारे प्रकल्प मंडळ, ओरोस-सिंधुदुर्ग अंतर्गत कार्यान्वित करण्यास्तव मंजूर आस्थापनेसह संलग्न. तसेच विभागाच्या नावात व मंडळीय नियंत्रणात तसेच विभागांतर्गतच्या ८ पैकी ४ उपविभागीय कार्यालयांच्या मंडळीय व विभागीय नियंत्रणात व २ उपविभागांच्या मुख्यालयात बदल. |
| C-१ | | | | तिलारी कालवा उपविभाग क्र १, कोनाळकट्टा (बांधकाम) | उपविभागीय कार्यालय विभागीय कार्यालयासह या मंडळांतर्गत वर्ग झाल्याने सदर उपविभाग अस्तित्वातील कार्यभार, कार्यालयीन अभिलेख व मंजूर आस्थापनेसह संलग्न. |
| C-२ | | ---- | | तिलारी कालवा उपविभाग क्र.२, सावंतवाडी (बांधकाम) | उपविभागीय कार्यालय विभागीय कार्यालयासह या मंडळांतर्गत वर्ग झाल्याने सदर उपविभाग अस्तित्वातील कार्यभार, कार्यालयीन अभिलेख व मंजूर आस्थापनेसह संलग्न. तसेच उपविभागाच्या मुख्यालयात बदल. |
| C-३ | | ---- | | तिलारी कालवा उपविभाग क्र.३, कोनाळकट्टा (बांधकाम) | उपविभागीय कार्यालय विभागीय कार्यालयासह या मंडळांतर्गत वर्ग झाल्याने सदर उपविभाग अस्तित्वातील कार्यभार, कार्यालयीन अभिलेख व मंजूर आस्थापनेसह संलग्न. |
| C-४ | | ---- | | तिलारी कालवा उपविभाग क्र.४, सावंतवाडी (बांधकाम) | उपविभागीय कार्यालय विभागीय कार्यालयासह या मंडळांतर्गत वर्ग झाल्याने सदर उपविभाग अस्तित्वातील कार्यभार, कार्यालयीन अभिलेख व मंजूर आस्थापनेसह संलग्न. तसेच उपविभागाच्या मुख्यालयात बदल. |
| C-५ | | ---- | | गुण नियंत्रण उपविभाग, कोनाळकट्टा (बांधकाम) | रत्नागिरी पाटबंधारे मंडळ, रत्नागिरी अंतर्गतचा तिलारी शीर्षकामे विभाग क्र.१, कोनाळकट्टा या बंद झालेल्या विभागीय कार्यालयाकडील सदरहू उपविभाग अस्तित्वातील कामासह व बांदाशाखा कालव्याच्या १९ ते २४ कि.मी. पर्यंतच्या कामांसाठी या विभागांतर्गत मंजूर आस्थापनेसह संलग्न. तसेच उपविभागाच्या मंडळीय व विभागीय नियंत्रणात बदल. |

| सध्याची कार्यालयाची रचना | | | बदलानंतरची कार्यालयाची रचना | | मंडळ व मंडळांतर्गत कार्यालयांमध्ये झालेले बदल - |
|---|---|---|---|---|---|
| अ. क्र. | विभाग कार्यालय | उप विभाग कार्यालय | विभाग कार्यालय | उप विभाग कार्यालय | |
| C-६ | | ---- | | तिलारी मुख्य धरण उपविभाग, तिलारीनगर (विद्युत) | रत्नागिरी पाटबंधारे मंडळ, रत्नागिरी अंतर्गतचा तिलारी शीर्षकामे विभाग क्र.१, कोनाळकट्टा बंद झालेल्या विभाग कार्यालयाकडील उपविभाग अस्तित्वातील कार्यभारासह व बंद झालेल्या तिलारी वसाहत उपविभाग, तिलारीनगर अंतर्गतच्या उर्वरित कार्यभार आणि अभिलेख तसेच शीर्षखणी धरण व धमणे धरण प्रकल्पिय कामांसाठी या विभागांतर्गत मंजूर आस्थापनेसह संलग्न. तसेच उपविभागाच्या मंडळीय व विभागीय नियंत्रणात बदल. |
| C-७ | | ---- | | तिलारी शीर्षकामे उपविभाग क्र.२, कोनाळकट्टा (बांधकाम) | रत्नागिरी पाटबंधारे मंडळ, रत्नागिरी अंतर्गतचा तिलारी शीर्षकामे विभाग क्र.१, कोनाळकट्टा या बंद झालेल्या विभागीय कार्यालयाकडील सदरहू उपविभाग अस्तित्वातील कार्यभार, अभिलेख व वसाहत व्यवस्थापन बांदाशाखा कालव्याच्या १६ ते १८ कि.मी. व ५१ ते ५७ कि.मी. पर्यंतच्या कामांसाठी या विभागांतर्गत मंजूर आस्थापनेसह संलग्न. तसेच उपविभागाच्या मंडळीय व विभागीय नियंत्रणात बदल. |
| C-८ | | ---- | | तिलारी शिर्षकामे उपविभाग क्र.५, कोनाळकट्टा (बांधकाम) | रत्नागिरी पाटबंधारे मंडळ, रत्नागिरी अंतर्गतचा तिलारी शीर्षकामे विभाग क्र.१, कोनाळकट्टा या बंद झालेल्या विभागीय कार्यालयाकडील सदरहू उपविभाग अस्तित्वातील कार्यभार, अभिलेख तसेच खळग्यातील दगडी धरण व कोनाळ जलविद्युत प्रकल्प व भूसंपादन, भुकंपमापन कामांसाठी या विभागांतर्गत मंजूर आस्थापनेसह संलग्न. तसेच उपविभागाच्या मंडळीय व विभागीय नियंत्रणात बदल. |
| एकूण | २ | १० | ३ | १८ | |

Sangeeta M Kholgadge

Digitally signed by Sangeeta M Kholgadge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SECTION OFFICER, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=24b378b1cb0f3c9d70d93261e45c83a11f0c2bbeb199c1858522d36476761396, cn=Sangeeta M Kholgadge
Date: 2017.03.08 12:32:18 +05'30'

(सं.म.खोलगाडगे)

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन